आस्थापना
मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, पुणे
अस्थायी पदांना मुदतवाढ.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक : एमसीटी-०३०४/११९/सीआर-३१/परि-५,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ दिनांक : २९ मार्च, २००४

**वाचा :-** १) शासन निर्णय, गृहविभाग, क्रमांक :एमसीटी-०१७८/३/परि-५, दिनांक ७ ऑगस्ट,१९८१.
२) शासन निर्णय, गृहविभाग, क्रमांक : एमसीटी-०२०३/२८१/सीआर-३२/परि-५, दिनांक १७.४.२००३, दि.३०.९.२००३ व दि.८.१.२००४
३) सदस्य, मोटार अपघात दावा न्यायधिकरण, पुणे यांचे पत्र क्र.१३७/२००४, दि. १०.३.२००४

**शासन निर्णय :-** मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, पुणे यांचे आस्थापनेवरील खालील अस्थायी पदांना शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक : एमसीटी-०२०३/२८१/सीआर-३२/परि-५, दिनांक ८.१.२००४ अन्वये १.१.२००४ पासून दिनांक २९.२.२००४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदरहू पदांना दिनांक १.३.२००४ ते दिनांक ३१.८.२००४ पर्यंत या शासन निर्णयानुसार मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर पदे सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नाहीत.

| अ.क्र. | पदाचे नाव | पदांची संख्या | पदे निर्माण केलेल्या शासन निर्णयाचा क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. |
| १. | कनिष्ठ लिपिक | १ | शासन निर्णय,गृहविभाग,क्रमांक/एमसीटी-०१७८/३/परि-७ दिनांक ७.८.८१ |
| २. | टंकलेखक | १ | -"- |
| ३. | बेलीफ | १ | -"- |
| ४. | शिपाई | १ | -"- |

२. या बाबत होणारा खर्च " २०४१-वाहनांवरील कर, ८०० (एक) मोटार अपघात दावा न्यायाधिकरण " या शिर्षाखालील या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

३.  हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक.सीआर-२८६/२००४/व्यय-८, दिनांक २२.३.२००४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(बा. बा. कमाळे)
कार्यासन अधिकारी, गृहविभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

प्रबंधक, उच्च न्यायालय ( अपिल साईड ) मुंबई (पत्राने ),
जिल्हा व सत्र न्यायाधिश, पुणे.
सह जिल्हा व सत्र न्यायाधिश व सदस्य मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, पुणे.
महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र -१ मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
वित्त विभाग ( व्यय-८) /अर्थसंकल्प -१९ मंत्रालय, मुंबई.
गृहविभाग, कार्यासन बीयुडी-१, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती ( परि -५ )